महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, राज्य अभियान व्यवस्थापन कक्ष या कार्यालयातील प्रतिनियुक्तीवरील कालावधी संपुष्टात आणून श्री.स.बा.रेंगे, सहायक कक्ष अधिकारी यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागास प्रत्यावर्तीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २५१८/प्र.क्र.१३०/१४-अ**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**तारीख: ०८ ऑक्टोबर, २०२१**

<u>संदर्भ</u> :
१) समक्रमांकाचे दिनांक २९-०८-२०१८ चे शासन आदेश.
२) समक्रमांकाचे दिनांक २६-१०-२०२० चे शासन आदेश.
३) समक्रमांकाचे दिनांक १८-११-२०२० चे शासन आदेश.
४) श्री.स.बा.रेंगे, सहायक कक्ष अधिकारी यांचे दिनांक २५-०८-२०२१ व दिनांक ०६-०९-२०२१ रोजीचे अर्ज

## शासन आदेश

संदर्भाधिन क्र. १ येथील दिनांक २९-०८-२०१८ च्या आदेशान्वये श्री.स.बा.रेंगे, सहायक कक्ष अधिकारी, नियोजन विभाग यांच्या सेवा २ वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, राज्य अभियान व्यवस्थापन कक्ष, नवी मुंबई यांच्या कार्यालयात सहायक कक्ष अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या. सदरहू पदावर श्री. रेंगे हे दिनांक ०५-०९-२०१८ पासून कार्यरत असून त्यांचा त्या कार्यालयातील सहायक कक्ष अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीचा २ वर्षाचा कालावधी दिनांक ०४-०९-२०२० रोजी संपुष्टात आल्यानंतर संदर्भाधिन क्र. २ येथील दिनांक २६-१०-२०२० च्या आदेशान्वये त्यांच्या सेवा त्यांच्या मूळ विभागात प्रत्यावर्तीत करण्यात आल्या होत्या. तद्नंतर प्रशासकीय कारणास्तव संदर्भाधिन क्र. ३ येथील दिनांक १८-११-२०२० च्या आदेशान्वये त्यांच्या प्रतिनियुक्तीस ३ ऱ्या वर्षासाठी दिनांक ०५-०९-२०२० ते दिनांक ०४-०९-२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. संदर्भाधिन क्र. ४ येथील दिनांक २५-०८-२०२१ व दिनांक ०६-०९-२०२१ च्या अर्जान्वये श्री.स.बा.रेंगे, सहायक कक्ष अधिकारी यांनी त्यांचा प्रतिनियुक्ती कालावधी दिनांक ०४-०९-२०२१ रोजी संपुष्टात येत असल्याने त्यांनी त्यांच्या सेवा मूळ विभागात म्हणजेच नियोजन विभागात प्रत्यावर्तीत करण्याची विनंती केली आहे.

३. मंत्रालयीन विभागात सहायक कक्ष अधिकारी संवर्गातील पदे मोठ्या प्रमाणात रिक्त आहेत. यास्तव श्री. रेंगे यांच्या प्रतिनियुक्तीस कोणतीही मुतदवाढ न देता, त्यांचा प्रतिनियुक्तीवरील कालावधी संपुष्टात आणून, श्री.स.बा.रेंगे, सहायक कक्ष अधिकारी यांच्या प्रतिनियुक्तीवरील सेवा दिनांक १८-१०-२०२१ (म.पू) पासून त्यांच्या मूळ विभाग (नियोजन विभागात) प्रत्यावर्तीत करण्यात येत आहे.

४. श्री. स.बा.रेंगे यांनी आपल्या नियोजन विभागात तातडीने रुजू होऊन तसा अहवाल या विभागास सादर करावा.

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, राज्य अभियान व्यवस्थापन कक्ष, नवी मुंबई यांनी श्री.रेंगे यांना तातडीने कार्यमुक्त करावे व दिनांक १७-१०-२०२१ नंतर कोणतेही वेतन व भत्ते अदा करु नये.

६. संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी श्री. स.बा.रेंगे, सहायक कक्ष अधिकारी हे आपल्या मंत्रालयीन प्रशासकीय विभागात रुजू झाल्याची वस्तुस्थिती या विभागास कळवावी.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११००८१७११०३५००७ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2021.10.08 17:14:20 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.स.बा.रेंगे, सहायक कक्ष अधिकारी (संबंधित कार्यालयामार्फत)

**प्रत,**

१) अ.मु.स./प्रधान सचिव/सचिव, ग्राम विकास विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, राज्य अभियान व्यवस्थापन कक्ष, सिडको भवन, ५ वा मजला, (दक्षिण कक्ष) सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई ४०० ०६१४.
३) सह/उप सचिव (आस्थापना), नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई ४०००३२.
४) सह/उप सचिव (योजना-३), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
५) सा.प्र.वि./का.क्र.१४-अ (संग्रहार्थ/निवड नस्ती)